श्रध्देय

परमपूज्य गुरुवर्य

ह.भ.प. श्री गुरुबाबा महाराज औसेकर

यांचे चरणी

अर्पण

# मनोगत

लोकसभा २०१४ च्या निवडणूकांचे वारे वाहू लागले, तसा राजकीय घडामोडींना वेग येऊ लागला. आणि त्यानिमित्ताने घडणाऱ्या राजकीय नाट्यमय घडामोडीं वरील वात्रटिका मी माझ्या ब्लॉगवर 'पॉलिटिका'नावाने लिहू लागलो.

त्यातील काही वात्रटिकांचा संग्रह पुस्तक रुपाने प्रकाशित करावा अशी कल्पना मनात होती. ती कल्पना या ई-पुस्तकाच्या माध्यमातून साकारण्याचा प्रयत्न केला आहे.

या पुस्तकाचे लेखन, टाईपसेटींग, मुखपृष्ठ, मांडणी व प्रकाशन अश्या सर्व भूमिका मीच पार पाडल्या आहेत. त्यामुळे सबकुछ मीच असलेले माझे हे पहिलेच ई-पुस्तक आज आपल्या हाती देताना मला अतिशय आनंद होत आहे.

या निमित्ताने मी माझे सहकारी ब्लॉगर बंधू, भगिनी आणि सर्व रसिक वाचकांना धन्यवाद देतो. तसेच या पुस्तकाच्या वितरणाची प्रमुख जबाबदारी 'ई साहित्य प्रतिष्ठान'ने घेतल्यामुळे मी ई साहित्य प्रतिष्ठान टीमचेही आभार मानतो.

या पुस्तकात प्रकाशित झालेल्या वात्रटिका या लोकसभा निवडणूक २०१४ च्या पार्श्वभूमीवर घडलेल्या घडामोडीवर आधारित आहेत. त्यामध्ये कुणाच्याही भावना दुखावण्याचा हेतू नाही. केवळ मनोरंजनाच्या दृष्टीने त्याकडे पहावे.

या पुस्तकातील वात्रटिकांतून व्यक्त झालेली मते ही माझी व्यक्तिगत असून, त्याच्याशी या पुस्तकाच्या वितरण संस्थेचा काही संबंध नाही.

**रमण कारंजकर**

# आणिबाणी

आयुष्यभर काढली

दुसऱ्यांची उणीदुणी,

शेवटी आज उद्भवली

राजदमध्येच आणिबाणी

# प्रत्येकाचं दिसतयं

आपलं ठेवावं झाकून

दुसऱ्याचं बघावं वाकून,

जनता हसतेय आता

प्रत्येकाचं दिसतयं ते बघून

# तो क्या हुआ

*नितीश म्हणाले लालूला,*

*'तेरा' मेरे साथ है।*

*लालू म्हणाले नितीशला,*

*अभीभी 'नौ' मेरे हाथ है ।*

## कोण वाईट,

## कोण चांगला

सत्तेसाठी टाकलेल्या उड्यांचा खेळ

आता रंगायला लागला,

उडी मारल्यावर झाली उपरती

सोडलेला वाईट, धरलेलाच चांगला

# संपला वनवास

चौदा वर्षाचा वनवास

बारा वर्षातच खलास,

भाजपच्या कमळात

लोजपचा रामविलास

# जोडगोळी

*निवडणूकीच्या रणभूमीवर*

*सत्यपाल अन व्हीकेची फळी,*

*भाजपच्या डबलबार बंदुकीत*

*सिंगांची जोड 'गोळी'*

# नाराज अजूनी

सदाभाऊंनी माढा गटवले,

जानकरांना बारामतीत पाठवले,

महायुतीने प्रकरण मिटवले,

पण अजूनी नाराज आठवले

## ‘महा’राज युती

लोकसभेचे रण सोडा

मोदींना दिल्लीत धाडा

‘महा’राज युती साठी

उघडा आहे आमचा वाडा

# बात हजम नही हुई

पंचतारांकित भोजन

फक्त दोघांनाच रुचले

बात हजम न झाल्याने

महायुतीला नाही पचले

# आदर्श सभा

राहुल गांधींच्या सभेत
अशोक चव्हाण मागे दिसले
लगेचच ओरडले विरोधक
भ्रष्टाचाराला पाठीशी घातले

# आघाड्यांची दुकाने

सत्तेच्या भागीदारीची गणिते

आता जुळायला लागली

येताच निवडणूकीची दिवाळी

आघाड्यांची दुकाने उघडायला लागली

# स्टंटबाजी

*व्यर्थ गेली राजकारणात ह्यात*

*'आप'ल्यासमोर मस्तक टेकावे*

*स्टंटबाजी कशी करायची असते*

*ते फक्त केजरीवालकडूनच शिकावे*

# ‘हात’ बल

*उमेदवार शोधून शोधून*

*घड्याळ झाले हतबल*

*‘हात’कणंगलेत वाढले अखेर*

*काँग्रेसचेच ‘हात’ बल*

# तिसऱ्याचा लाभ

मोदीवर लक्ष आहे म्हणत

सेनाच खरी लक्ष्य आहे

दोघांच्या संघर्षात सत्ता मात्र

तिसऱ्याचेच भक्ष्य आहे

# लाल फितीची शिस्त

गोठलेल्या गारपीटग्रस्तांची मढी
सरणांवर गेली तरी विलाज नाही
नियमानुसारच मिळेल त्यांना मदत
कुणी घाई करायचं काम नाही
कुणासाठीही नियम धाब्यावर बसवायला
हे काही 'आदर्श'चं बांधकाम नाही

# आमची ‘खास’ थाळी

पार्टी फंड गोळा करण्याचा
‘आम’ भोजनालयाचा नवा फंडा
दहा हजाराची ‘एके’ थाळी बघून
‘आम’ आदमी मात्र पुरता थंडा

# *वाराणसी यात्रा*

*‘नमो’ला नामोहरम करण्यासाठी*

*‘एके’ करणार वाराणसी यात्रा*

*काशी विश्वेश्वराला कौल मागण्याऐवजी*

*बोलविली मात्र ‘आम’चीच जत्रा*

## पॅकेज

*निवडणूकीच्या तोंडावर नेतेमंडळी*

*नाराजांना निमंत्रणे धाडायला लागली*

*प्रवेशासोबतच तिकीटांची पॅकेजेस*

*निष्ठावंतांनाही भुरळ पाडायला लागली*

# ‘नमो’ थाळी

‘एके’ पाठोपाठ ‘नमो’ थाळी
आता लाखोंत मिळायला लागली
पंचतारांकित भोजनामुळे पक्षांची भूक
भागण्याऐवजी वाढायला लागली

# पक्षांतराचा ज्वर

*नाराजीची लागण झाल्याने सर्वत्र*

*पक्षांतराचा ज्वर वाढायला लागला*

*बंडखोरीची साथ येण्याच्या भितीने*

*नेत्यांच्या घोर वाढायला लागला*

# कॅन्डीडसी पोर्टेबिलीटी

'कॅन्डीडसी पोर्टेबिलीटी'कडे

इच्छुक आता वळत आहेत कारण

पक्ष बदलला तरी उमेदवारी कायम

ही 'मस्त सुविधा' त्यात मिळत आहे

# शाईनिंग

वर्तमानपत्राच्या कागदावर

राजकीय नेत्यांच्या तोंडावर

सर्वसामान्य मतदारांच्या बोटावर

सगळीकडे शाईचीच इनिंग सुरू आहे

जरी असेल रंग काळा तरी

शेवटी तिच शाईनिंग करत आहे

# झेंडा

भ्रष्टाचाराच्या विरोधात लाल झेंडा
जाहिर सभेत फडकवायचा असतो
नांदेड एक्सप्रेसला हिरवा दाखविताना
मात्र तो गुंडाळून ठेवायचा असतो

## अभिप्राय द्या

या पुस्तकाविषयी आपला अभिप्राय जरुर कळवा. आपला अभिप्राय खाली दिलेल्या मनाली ई पब्लिकेशन्सच्या ई-मेल पत्त्यावर पाठवा. किंवा माझ्या ब्लॉगवर लिहा.

## आगळं! वेगळं!!!

http://nathtel.blogspot.com

हे पुस्तक आपण आपल्या परिचितांमध्ये ब्ल्यू टूथ, पेनड्राईव्ह, ईमेल अशा माध्यमातून अवश्य वितरीत करा.

विविध मराठी ई-पुस्तके, नियतकालिके विनामूल्य

डाऊनलोड करण्यासाठी येथे जरुर भेट द्या

www.esahity.com


## । मनाली ई पब्लिकेशन्स ।

manali.pub@gmail.com